अ.भा.से.(कार्यमुल्यांकन अहवाल) नियम, २००७ अनुसार भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकाऱ्यांच्या वैद्यकीय चाचण्यांबाबत...... मुदतवाढ.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**परिपत्रक क्रमांक : भाप्रसे-१५२४/प्र.क्र.२१६/२०२४/भाप्रसे-३,**

मंत्रालय,मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : २६ मार्च, २०२५

वाचा : १. शासन निर्णय समक्रमांक दि.१७.०१.२०२५

परिपत्रक -

अखिल भारतीय सेवा (कार्यमुल्यांकन अहवाल) नियम, २००७ अनुसार भारतीय प्रशासकीय सेवेतील ४० वर्षे वयावरील अधिकाऱ्यांच्या वैद्यकीय तपासणी अहवालाचा सारांश त्यांच्या कार्यमुल्यांकन अहवालासोबत जोडणे आवश्यक आहे. याकरिता सन २०२४-२५, २०२५-२६ व २०२६-२७ च्या कार्यमुल्यांकन अहवालाकरिता वैद्यकीय तपासणीबाबत शासन निर्णय समक्रमांक दि.१७.०१.२०२५ अन्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. कार्यमुल्यांकन अहवालाचे वर्ष दिनांक ३१ मार्च रोजी संपत असल्याने वैद्यकीय चाचणीही ३१ मार्चपर्यंत करुन घेणे अपेक्षित आहे. तथापि, विधानमंडळ अधिवेशनाचे कामकाज, प्रशिक्षण इत्यादी कारणास्तव दिनांक ३१ मार्च, २०२५ पर्यंत वैद्यकीय तपासणी करुन घेणे शक्य होत नसल्याने याकरिता मुदतवाढ देण्याबाबत काही भाप्रसे अधिकाऱ्यांकडून विनंती करण्यात येत आहे.

२. या बाबीचा विचार करुन अ.भा.से.(कार्यमुल्यांकन अहवाल) नियम, २००७ अनुसार भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकाऱ्यांनी कार्यमुल्यांकन **वर्ष २०२४-२५ करिता वैद्यकीय चाचण्या करुन घेण्याकरिता दिनांक १५ एप्रिल, २०२५ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात येत आहे.**

३. शासन निर्णय दिनांक १७.०१.२०२५ मधील अन्य सर्व तरतुदी कायम राहतील.

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०३२६१७५४४४९७०७ असा आहे. सदर परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

ABASAHEB ATMARAM KAWALE

Digitally signed by ABASAHEB ATMARAM KAWALE
DN: CN = ABASAHEB ATMARAM KAWALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2025.03.26 17:56:04 +05'30'

**( आबासाहेब आ. कवळे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७. महाराष्ट्र संवर्गातील ४० वर्षे वयावरील भारतीय प्रशासकीय सेवेतील सर्व अधिकारी.
८. शासन निर्णय दिनांक १७.०१.२०२५ च्या प्रपत्र -अ मधील सर्व खाजगी रुग्णालये.
९. सर्व शासकीय, महानगरपालिका रुग्णालयांचे अधिष्ठाता / जिल्हा शल्य चिकित्सक.
१०. निवड नस्ती ( भाप्रसे-३ )